मोटार वाहन विभागांतर्गत नवीन प्रादेशिक/उपप्रादेशिक परिवहन कार्यालये स्थापन करणेसंदर्भातील निकष..

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी ०८१५/प्र. क्र. २३३/परि-४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: १८ जुन २०१८

वाचा :-

१) परिवहन आयुक्त कार्यालयाचे कार्यालयीन आदेश क्र. पआ/ स्वीस/ समिती २०११/ जा. क्र. १०००१ए, दि.९.८.२०११.
२) अध्यक्ष तथा अपर परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे क्र. म. का. स्था/निकष/समिती/२०११, दि.१२.८.२०११.
३) शासन पत्र, गृह विभाग क्र. एमव्हीडी-०८१५/प्र. क्र. २३३/परि-४, दि.२७.१०.२०१५.
४) अपर परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांचे कार्यालयीन आदेश क्र. १४/पआका/ नवीन कार्यालय/ का.१०/ २०१६/ जा. क्र. १६८६, दि.११.२.२०१६
५) अपर परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांचे क्र पआका/नवीन का. निकष का. (१०)/ जा. क्र. ६६६८, दि.२६.४.२०१८ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

मोटार वाहन विभागाचे महसूल उद्दीष्ट साध्य करण्यासाठी मोटार वाहन विभागांतर्गत नवीन परिवहन कार्यालये सुरु करण्यासाठी निकष ठरविण्याकरिता सुरवातीस परिवहन कार्यालयाच्या संदर्भाधीन क्र. १ वरील दि.९.८.२०११ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये अपर परिवहन आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली होती. सदर समितीने संदर्भाधीन क्र. २ वरील दि.१२.८.२०११ रोजीच्या पत्रान्वये त्यांच्या शिफारशी सादर केल्या होत्या. नवीन प्रादेशिक/ उपप्रादेशिक परिवहन कार्यालय निर्माण करणेसाठी समितीने, एकूण वाहन संख्या, एकूण परिवहन वाहन संख्या, नवीन अनुज्ञप्तीची वार्षिक संख्या, शिकाऊ अनुज्ञप्तींची वार्षिक संख्या व वार्षिक महसूल वसूली इत्यादी घटक विचारात घेतले होते. तथापि यामध्ये उपलब्ध मनुष्यबळ व विहीत केलेल्या वाहनांची संख्या व्यस्त असल्याने प्रस्तावित निकषात बदल करणेसाठी संदर्भाधीन क्र. ३ वरील दि.२७.१०.२०१५ रोजीच्या पत्रान्वये, नवीन प्रादेशिक / उप प्रादेशिक परिवहन कार्यालय स्थापन करण्यासाठीच्या समितीने सुचविलेल्या निकषातील बाबी तपासण्यासाठी परिवहन आयुक्त कार्यालयाने संदर्भाधीन क्र. ४ वरील दि.११.२.२०१६ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये अपर परिवहन आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमली होती. प्रस्तुत समितीचा अहवाल संदर्भाधीन क्र. ५ वरील दि.२६.४.२०१८ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झाला असून समितीने केलेल्या शिफारशींना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यामध्ये मोटार वाहन विभागांतर्गत नवीन कार्यालय निर्मितीसंदर्भातील निकष विहीत करणेसंदर्भात नियुक्त केलेल्या समितीच्या खालील शिफारशींना शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) एखाद्या जिल्ह्याचे विभाजन होऊन नवीन जिल्हा निर्माण झाला असेल तर या नवीन जिल्ह्यांच्या कार्यक्षेत्रामध्ये नवीन परिवहन कार्यालयाची स्थापना करावी. इतर कोणत्याही परिस्थितीत नवीन कार्यालयाची स्थापना करु नये.

२) ज्या जिल्ह्यांची लांबी जास्त आहे अशा जिल्ह्यांमध्ये जनतेच्या सोईसाठी नवीन परिवहन कार्यालय उघडण्याऐवजी वाहन चालक चाचणी केंद्र तसेच वाहन तपासणी व परिक्षण केंद्र स्थापन करण्यात यावीत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१८१५१९५९१२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2018.06.18 15:21:36 +05'30'

**(द. ह. कदम)**
अवरसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी, महाराष्ट्र राज्य
७. निवडनस्ती, परि-४